**सहाय्यक पोलीस अधीक्षकांची आठ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.**
**परिविक्षाधीन भारतीय पोलीस सेवा अधिकारी-६८ वी तुकडी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयपीएस-०३१७/प्र.क्र.११/पोल-१**
२ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मुंबई-४०००३२.
दिनांक: १३ जानेवारी, २०१७

**पहावे:-१)** विशेष पोलीस महानिरिक्षक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र.प्रशिक्षण/ ट्रेनिंग-२/६८आर आर बॅच/१३५०/५६१४/२०१६, दिनांक २८.१२.२०१६.
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि २०१२/ प्र.क्र.६६/ १२/ वित्तीय सुधारणा, दिनांक ११ जुलै, २०१२

**प्रस्तावना :-**

भारतीय पोलीस सेवेच्या ६८ व्या तुकडीतील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना ते महाराष्ट्र राज्यात परिविक्षाधीन म्हणून रुजू झाल्यापासून म्हणजेच दि.१२.१२.२०१६ ते दि.०१.०७.२०१७ ( ६ महिने १८ दिवस ) पर्यंतच्या कालावधीत महाराष्ट्र राज्यात प्रशिक्षण घेण्याकरीता 'सहाय्यक पोलीस अधीक्षकांची' अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा तसेच या कालावधीतील वेतन व भत्ते यासाठी रु.४४,३९,३०४/- (रुपये चव्वेचाळीस लाख एकोणचाळीस हजार तीनशे चार फक्त) इतका खर्च मंजूर अनुदानातून भागविण्याचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे. सदर पदे सातव्या वेतन आयोगानुसार pay matrix च्या स्तर १० नुसार भारतीय पोलीस सेवेतील कनिष्ठ वेतनश्रेणीतील म्हणजे रु.५६,१००/- मुळ वेतन या वेतन श्रेणीतील आहेत. त्यानुसार शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

भारतीय पोलीस सेवेच्या ६८ व्या तुकडीतील खालील आठ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांची ते महाराष्ट्र राज्यात परिविक्षाधीन म्हणून रुजू झाल्यापासून म्हणजेच दि.१२.१२.२०१६ ते दि.०१.०७.२०१७ ( ६ महिने १८ दिवस ) पर्यंतच्या कालावधीत महाराष्ट्र राज्यात प्रशिक्षण घेण्याकरीता 'सहाय्यक पोलीस अधीक्षकांची' आठ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रशिक्षणार्थींचे नांव | प्रशिक्षणासाठी नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|
| १ | प्रियंका मिना | पालघर |
| २ | घुगे संदिप | रायगड |

| | | |
|---|---|---|
| ३ | नवटके भाग्यश्री बाबुराव | कोल्हापूर |
| ४ | अतुल विकास कुलकर्णी | सोलापूर ग्रा. |
| ५ | रगासुधा आर | सातारा |
| ६ | नुरल हसन | बीड |
| ७. | मनिष कलवानिया | जळगाव |
| ८. | जी विजया कृष्णा यादव | अमरावती ग्रा. |

२. तसेच उपरोक्त नमूद आठ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक आणि त्यानंतर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या जिल्हयात प्रशिक्षण कालावधीकरिता वेतन व भत्ते यासाठी रु.४४,३९,३०४/- (रुपये चव्वेचाळीस लाख एकोणचाळीस हजार तीनशे चार फक्त) इतका खर्च करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. यासाठी होणारा खर्च "२०५५-पोलीस- १०९ (०१) जिल्हा पोलीस बल " या उपलेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ व सन २०१७-१८ या वर्षीच्या मंजूर असलेल्या अनुदानातून वेतन व भत्ते या उद्दीष्टामधून खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि २०१२/ प्र.क्र.६६/ १२/ वित्तीय सुधारणा, दिनांक ११ जुलै, २०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११११४५८३१३६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Tushar Vasantrao Mahajan

Digitally signed by Tushar Vasantrao Mahajan
DN: CN = Tushar Vasantrao Mahajan, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home
Date: 2017.01.13 16:38:34 +05'30'

**( तुषार महाजन )**
**अवर सचिव, गृह विभाग**

प्रति,

- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

- महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- विशेष पोलीस महानिरिक्षक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
- निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
- जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
- संबधीत जिल्हा कोषागार अधिकारी,
- सह संचालक (तांत्रिक), लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई (२ प्रती).
- वित्त विभाग, व्यय-७ / वित्तीय सुधारणा-१/अर्थसंकल्प-३/ अर्थसंकल्प-१० / विनियम, मंत्रालय, मुंबई.
- सहाय्यक संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुंबई.
- अवर सचिव, कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुंबई.
- वैयक्तिक नस्ती / निवड नस्ती (पोल-१).